**अपंग समावेशित शिक्षण योजना (प्राथमिक स्तर) अंतर्गत करार पध्दतीने कार्यरत दिव्यांग विशेष शिक्षकांच्या वाहतूक भत्त्याच्या (Transport Allowance) दरात केलेल्या सुधारणेनुसार २१६ दिव्यांग कर्मचाऱ्यांना त्यांच्या पदाला अनुज्ञेय असणाऱ्या वाहतूक भत्त्याची रक्कम वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-बैठक-२०२४/प्र.क्र. ०८/एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २८ मे, २०२४.

**वाचा:-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-वाहभ २०२०/प्र.क्र. ०३/सेवा-५, दि.२०.०४.२०२२.

२. शासन निर्णय, समक्रमांक, दि. २६.०२.२०२४.

३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं २०२४/प्र.क्र. ३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.

४. राज्य प्रकल्प समन्वयक तथा सहसंचालक (प्रशा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र, क्रमांक- मप्राशिप/ समग्र शिक्षा/ IE/ (१५/२२)/ २०२२-२३/१२९८, दि.१०.०४.२०२४.

**प्रस्तावना:-**

सर्व शिक्षा अभियानाची अंमलबजावणी सन २०००-२००१ पासून देशभरात झाली. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दिनांक १८.१.२००२ च्या शासन निर्णयान्वये सर्व शिक्षा अभियानाची अंमलबजावणी राज्यात करण्याचा निर्णय घेण्यात आला व सदर अभियानाच्या अंमलबजावणीची जबाबदारी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे सोपविण्यात आली. सदर संस्था ही "सोसायटीज रजिस्ट्रेशन ॲक्ट, १८६० व मुंबई विश्वस्त अधिनियम १९५० अन्वये पंजीकृत करण्यात आली आहे.

२. केंद्र शासनाच्या सर्व शिक्षा अभियान, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान व शिक्षक शिक्षण या योजनांचे एकत्रिकरण करून सन २०१८-१९ पासून केंद्रीय योजना समग्र शिक्षा योजना अंमलात आली आहे. राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० मधील शिफारशींच्या अनुषंगाने समग्र शिक्षा योजनेची पुनर्रचना करण्यात आली आहे. सदर योजनेचे केंद्र आणि राज्य हिस्स्याचे प्रमाण ६०:४० असे आहे.

३. सर्व शिक्षा अभियानाची अंमलबजावणीच्या दृष्टीने मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांनी निर्गमित केलेल्या मॅन्युअल ऑन फायनान्शिअल मॅनेजमेंट ॲन्ड प्रोक्युअरमेंट २००४ मधील नियम ३७ (मॅनेजमेंट कॉस्ट) अन्वये सर्व शिक्षा अभियानांतर्गत पदांना मंजूरी देताना नवीन पदनिर्मिती करू नये तसेच निर्माण केलेली पदे केवळ कंत्राटी अथवा प्रतिनियुक्तीने भरण्यात यावीत. सदर पदे भरल्यामुळे सोसायटी अथवा राज्य शासनावर कायमस्वरूपी दायित्व येता कामा नये, असे नमूद केले आहे.

४. मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या उपरोक्त नमूद मार्गदर्शक सूचनांच्या आधारे प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद सेवा नियमावली, १९९४ नुसार व्यवस्थापनांतर्गत मंजूर असलेल्या पदांपैकी काही पदे प्रतिनियुक्तीने तर काही पदे करार/कंत्राटी पद्धतीने भरण्यात आली आहेत. सदर पदे कंत्राटी/ प्रतिनियुक्तीने भरतांना महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद सेवा नियमावली, १९९४ मध्ये नमूद केलेल्या विहित प्रक्रियेचा अवलंब करण्यात आला आहे. तसेच नमूद कार्यपद्धतीनुसार करार पद्धतीने नियुक्ती देण्यात आलेल्या कर्मचा-यांच्या सेवा, दर सहा महिन्यांनी एक दिवसाचा खंड देऊन सुरू ठेवण्यात आल्या आहेत. सदर कंत्राटी कर्मचा-यांना केंद्र शासनाने मंजूर केलेल्या एकक दराने मानधन अनुज्ञेय आहे.

५. सदर योजनेंतर्गत समावेशित शिक्षण हा उपक्रम प्रकल्प मान्यता मंडळ बैठकीच्या इतिवृत्तामध्ये नमूद असलेल्या उपक्रमांची अंमलबजावणी करण्यात येते. तथापि, सदर योजना ही केंद्र पुरस्कृत असल्याने सदर मानधन वाढीच्या प्रस्तावाला केंद्र शासनाने मंजूरी दिलेली नाही. केंद्र शासनाचे मानधन निश्चित असल्याने अतिरिक्त निर्माण होणार वित्तीय भार हा राज्य शासनाच्या निधीतून करण्यासाठी मा.मंत्रिमंडळाने दि.२५.०२.२०२४ रोजीच्या बैठकीत मंजूरी देण्यात आली होती. त्यानुसार, समग्र शिक्षा योजनेंतर्गत मानधनावर कार्यरत असणाऱ्या ०६-जिल्हा समन्वयक, ५२-विशेष तज्ञ/ समावेशित शिक्षक व १५८-विशेष शिक्षक असे एकूण २१६ दिव्यांग कर्मचाऱ्यांना वित्त विभागाच्या दि. २०.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे वाहतूक भत्ता लागू करण्यास शासन निर्णय दि. २६.०२.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार, २१६ दिव्यांग कर्मचाऱ्यांना त्यांच्या पदाला अनुज्ञेय असणाऱ्या वाहतूक भत्त्याची रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय:-

१. समग्र शिक्षा योजनेंतर्गत मानधनावर कार्यरत असणाऱ्या ०६-जिल्हा समन्वयक, ५२-विशेष तज्ञ/ समावेशित शिक्षक व १५८-विशेष शिक्षक असे एकूण २१६ दिव्यांग कर्मचाऱ्यांना वित्त विभागाच्या दि.२०.०४.२०२२ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे वाहतूक भत्ता लागू करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर दिव्यांग-२१६ कर्मचाऱ्यांना वाहतूक भत्ता लागू करण्यात आल्याने मानधन वाढीतील फरकाची रक्कम रू.३२,२९,३८०/- (रुपये बत्तीस लाख एकोणतीस हजार तीनशे ऐंशी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च “मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६ शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (२२०२ आय ६१२) (राज्य हिस्सा ४० टक्के)” या लेखाशिर्षाखाली एप्रिल-२०२४ ते जुलै-२०२४ या कालावधीकरीता मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य प्राथमिक परिषद, मुंबई यांचेकडे सुपूर्त करण्यात येत आहे. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख शाखा/ लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तर सह सचिव/ उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर खर्च हा समग्र शिक्षा योजनबाहेरचा असल्याने संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरीत करुन समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय/परिपत्रक दि.०१.०४.२०२४ मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता होत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून त्याकरीताच्या अटी व शर्ती या शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. २००/१४७१, दि. १५.०४.२०२४ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ५३५/ व्यय-५, दि. २९.०४.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०५२८१४५७१६१९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e89181186 34069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B 9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.05.28 15:11:31 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. राज्य प्रकल्प संचालक (समग्र शिक्षा), महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/ नागपूर.
११. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३.
१२. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१३. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१५. अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती (एसडी-१).